**महाराष्ट्र शासन**

<u>तात्काळ</u>

क्र.एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र.२२७९४१७२/२२७९३३४४
दिनांक : ३ ऑगस्ट, २०१८

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय** :- राज्य माहिती आयोगाच्या विविध कार्यालयातील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत

**संदर्भ:-** १) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२,
दिनांक १७-१२-२०१६.
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४,
दिनांक ३१-०८-२०१७.

महोदय/महोदया,

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भ क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार ज्या कर्मचाऱ्यांचा राज्य माहिती आयोगाकडील प्रतिनियुक्तीचा कालावधी पुर्ण झालेला आहे त्या कर्मचाऱ्यांच्या सेवा मंत्रालयीन विभागात प्रत्यावर्तीत करुन त्यांचे जागी मंत्रालयीन विभागातील इच्छुकता दर्शविलेल्या व विभागांनी प्रतिनियुक्तीस सहमती दिलेल्या कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी तसेच राज्य माहिती आयोगाचे मुख्यालयात निम्नश्रेणी लघुलेखक व राज्य माहिती आयोगाच्या कोकण खंडपीठातील उच्चश्रेणी लघुलेखक व लिपिक टंकलेखक या संवर्गातील खाली नमूद करण्यात आलेली रिक्त पदे मंत्रालयीन विभागातील सदरहू संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरण्याकरीता मंत्रालयीन विभागातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे :-

| पदाचे नांव | राज्य माहिती आयोगाचे मुख्यालय | राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ | एकूण |
|---|---|---|---|
| उच्चश्रेणी लघुलेखक | ० | १ | **१** |
| निम्नश्रेणी लघुलेखक | १ | ० | **१** |
| लिपिक टंकलेखक | ० | ४ | **४** |
| एकूण रिक्त | १ | ५ | **६** |

२. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयील विभागातील, उच्चश्रेणी लघुलेखक, निम्नश्रेणी लघुलेखक, व लिपिक टंकलेखक यांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत. थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही.

३. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन खालील माहितीसह आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दिनांक १४-०८-२०१८ पर्यंत पोहोचतील अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा :-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ४) | शैक्षणिक अर्हता | |
| ५) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६) | मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ७) | मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०१७ रोजीचे) | |
| ८) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद, ठिकाण व कालावधी) | |
| १०) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |

४. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नाव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर **प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दिनांक १४-०८-२०१८ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.**

५. सद्य:स्थितीत शासनाने सरळसेवा भरतीवर निर्बंध घातले असल्याने प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या पदावर तत्काळ कर्मचारी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही. तथापि सरळसेवा व पदोन्नतीमधून ज्या प्रमाणात उमेदवार उपलब्ध होतील त्या प्रमाणात विभागातील रिक्त पदांच्या टक्केवारीनुसार विभागास त्या-त्या संवर्गातील कर्मचारी उपलब्ध करुन देण्यात येतील याची विभागांनी नोंद घ्यावी.

६. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवरील संदेशफलक या टॅबखाली प्रसिध्द करण्यात येत आहे.

७. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०८०३१६४१४५५३०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.08.03 16:44:09 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :- १) उप सचिव (कार्यासन -६), सामान्य प्रशासन विभागा, मंत्रालय, मुंबई-४०००३२

२) सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयसमोर, मुंबई-४०००३२

३), उप सचिव, राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, कोकण भवन, ५ वा मजला, सी.बी.डी.,-बेलापूर, नवी मुंबई-४००६१४

४) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ)